**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग (खुद्द) मार्फत खरेदी करण्यात आलेल्या व निर्लेखित केलेल्या शासकीय वाहन क्रमांक एमएच-०१-एएन-४०४१ (होंडा सिटी) च्या विक्रीबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,**
**शासन निर्णय क्र. वाहन(निर्लेख) २०२१/प्र.क्र.७७०/आस्था-२**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- १७ मे, २०२४

**संदर्भ :-** (१) नियंत्रक, शासकीय परिवहन सेवा, मुंबई यांनी दिनांक २०.०१.२०२२
(२) शासन निर्णय क्र.वाहन २०२१/ प्र.क्र.७७०/आस्था-२, दि. ३१.०१.२०२२
(३) वित्त विभाग परिपत्रक क्र.डीएफपी१०९१/प्र.क्र.४/विनियम, दि.१८.०६.१९९१.
(४) वित्त विभाग परिपत्रक क्र.विअप्र१०००/प्र.क्र.३१/२००१/विनियम, दि.१५.०६.२००१
(५) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. डीएफपी१०१६/प्र.क्र.०७/१६/विनियम, दि. २२.०६.२०१६

**प्रस्तावना :-**

सहकार, पणन व वस्त्राद्योग या विभागामार्फत तत्कालीन मा. मंत्री, (सहकार व संसदीय कार्य विभाग) यांचेकरिता दिनांक २२.०९.२०११ रोजी खरेदी करण्यात आलेले रु.८.९१ लक्ष किंमतीचे होंडा सिटी **क्र. एमएच-०१-एएन-४०४१** हे वाहन संदर्भीय अनुक्रमांक २ येथील दिनांक ३१.०१.२०२२ च्या शासन निर्णयान्वये निर्लेखित करण्यात आले. सदर वाहनाच्या विक्रीसाठी वित्त विभागाची दिनांक १८.६.१९९१, दिनांक १५.६.२००१ आणि दिनांक २२.६.२०१६ ची संदर्भीय परिपत्रके, सामान्य प्रशासन विभाग, माहिती तंत्रज्ञान संचालनालय यांचा संदर्भीय दिनांक ०३.१२.२०१४ चा शासन निर्णय यातील मार्गदर्शक सूचनांच्या अधीन राहून विहीत कार्यपध्दती अवलंबण्यात आलेली आहे.

२. निविदा सादर करावयाच्या कालावधीत विहीत पध्दतीने मोहोरबंद लिफाफ्यांमधून खालील ३ निविदा या विभागाकडे प्राप्त झाल्या आहेत :-

निविदा क्र.१ - श्री. संतोष स. आंब्रे, मुंबई - रु. ३२,०००/-

निविदा क्र.२ - श्रीम. द्वारका सु. ठोंबरे, मुंबई - रु. ३४,५००/-

निविदा क्र.३ - श्री. विरेंद्र वि. म्हात्रे, मुंबई - रू. २५,८००/-

यामध्ये श्रीम. द्वारका सु. ठोंबरे, मुंबई यांची निविदा अधिकतम किंमतीची आहे.

३. सदर वाहन सप्टेंबर, २०११ मध्ये खरेदी केले असून १२ वर्षे पूर्ण झालेली आहेत. वित्त विभागाच्या संदर्भीय शासन परिपत्रक दिनांक २२.०६.२०१६ मधील परि. ३ मध्ये नमूद केल्यानुसार प्रशासकीय विभागास, विभागाच्या ताब्यातील निर्लेखित केलेल्या शासकीय वाहनाच्या विक्रीबाबतचे अधिकार देण्यात आले आहेत.

४. सदर वाहन हे सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग (खुद्द) मार्फत विभागासाठीच खरेदी करण्यात आलेले असल्यामुळे आणि या प्रक्रियेमध्ये सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग (खुद्द) हाच प्रशासकीय विभाग असल्यामुळे **सदर वाहनाची विक्री या विभागामार्फत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार शासनाकडून आता खालीप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे :-**

**<u>शासन निर्णय</u> :-**

सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागामार्फत खरेदी करण्यात आलेले आणि संदर्भीय अनुक्रमांक २ येथील दिनांक ३१.०१.२०२२ च्या शासन निर्णयान्वये निर्लेखित करण्यात आलेल्या शासकीय वाहन क्रमांक **एमएच-०१-एएन- ४०४१ (होंडा सिटी) ची विक्री करण्यास खालीलप्रमाणे मंजूरी देण्यात येत आहे :-**

अ. वित्त विभागाची संदर्भीय अनुक्रमांक ३, ४ आणि ५ येथील शासन परिपत्रकांमधील मार्गदर्शक सूचनांनुसार विहीत कार्यपध्दती अवलंबून वाहन विक्रीसाठी आलेली निविदेची किंमत हातच्या किंमतीपेक्षा कमी येत असल्यास निविदा स्विकारण्याचे अधिकार प्रशासकीय विभागास देण्यात आलेले असल्यामुळे आणि या प्रक्रियेमध्ये सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग (खुद्द) हाच प्रशासकीय विभाग असल्यामुळे विभागाकडे प्राप्त झालेल्या ३ निविदांपैकी अधिकतम किंमतीची निविदा सादर केलेले श्रीम. द्वारका सु. ठोंबरे, मुंबई यांची रु. ३४,५००/- इतक्या रकमेची निविदा स्विकारण्यास आणि त्यास अनुसरून शासकीय वाहन क्रमांक **एमएच-०१-एएन- ४०४१ (होंडा सिटी) या वाहनाची "<u>वाहन जसे आहे त्या स्थितीत</u> " रु.३४,५००/- (रुपये चौतीस हजार पाचशे फक्त) इतक्या किंमतीस विक्री करण्यास** या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

ब. निविदा सादर केलेले अन्य २ निविदाकार, श्री. संतोष स. आंब्रे, मुंबई आणि श्री. विरेंद्र वि. म्हात्रे, मुंबई यांनी निविदेसाठी भरणा केलेली इसाऱ्याची प्रत्येकी रु.५००/- इतकी रक्कम त्यांना परत करण्यास या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे.

क. श्रीम. द्वारका सु. ठोंबरे, मुंबई यांनी निविदा सादर करताना भरणा केलेली इसाऱ्याची रु.५००/- इतकी रक्कम निविदेच्या रु. ३४,५००/- इतक्या रकमेमधून वजा करून उर्वरित रु. ३४,०००/- (रुपये चौतीस हजार फक्त) रकमेचा भरणा विभागाच्या रोखशाखेमार्फत शासन कोषागारात करण्यात आला आहे.

ङ त्यानंतर निविदाकार, श्रीम. द्वारका सु. ठोंबरे, मुंबई यांनी निविदा सूचनेमध्ये नमूद केलेल्या अटींपैकी क्र. ८ नुसार विक्रीकराचा भरणा करता येत नसल्यामुळे हमीपत्र या विभागाकडे सादर केले आहे.

इ. निविदाकार, श्रीम. द्वारका सु. ठोंबरे, मुंबई यांनी निविदा सूचनेतील अट क्र. ११ नुसार सदर वाहनाबाबतच्या हस्तांतरण नोंदणीबाबत सर्व प्रक्रिया स्वखर्चाने पूर्ण करावी.

ई. सदरहू सर्व प्रक्रिया पूर्ण केल्यानंतर शासकीय नवीन प्रशासकीय इमारतीच्या आवारात ठेवण्यात आलेले वाहन <u>जसे आहे त्या स्थितीत</u> घेऊन जाण्यासाठी त्यांना मान्यतेचे प्राधिकारपत्र सुपूर्द करण्यास

आणि त्यानंतर वाहन श्रीम. द्वारका सु. ठोंबरे, मुंबई यांचे ताब्यात देण्यास याअन्वये मंजूरी देण्यात येत आहे.

प. त्यानंतर वाहनाची इंजिन/चेसीस प्लेट आणि वाहन क्रमांक च्या मागील व पुढील अशा २ प्लेट्स आणि वाहनाचे मूळ RC Book हे, RTO कार्यालयामध्ये जमा करून सदर वाहनाची विभागाच्या नावे असलेली नोंदणी रद्द करून घेण्यात येईल.

२. सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक डीएफपी१०१६/प्र.क्र.०७/१६/विनियम, दिनांक २२.०६.२०१६ मधील परि. ३ अनुसार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकरांच्या अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या बेवसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२४०५१७१८०४३६५७०२ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

SANTOSH PUNAMCHAND KHORGADE

Digitally signed by SANTOSH PUNAMCHAND KHORGADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT,
2.5.4.20=c0546acca372ce2d8edbe5dc7949386daf8955a34dfda38bf6f34ce12b899ea7, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=08CF3286085F1309FD153E0C9A31F18D1C3CE4865E7DF75B4F8AA7B75A9A81EA, cn=SANTOSH PUNAMCHAND KHORGADE
Date: 2024.05.17 18:17:22 +05'30'

**( सं. पु. खोरगडे )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य-१/२, मुंबई/नागपूर
२) महालेखापाल, (लेखापरिक्षा), महाराष्ट्र राज्य-१/२, मुंबई/नागपूर
३) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
५) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई

**प्रत उचित कार्यवाहीसाठी :-**

कार्यासन अधिकारी (रोखशाखा), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मुंबई

**प्रत :-**

१. प्रधान सचिव (सहकार) यांचे स्वीय सहाय्यक
२. सचिव(वस्त्रोद्योग) यांचे स्वीय सहाय्यक
३. नियंत्रक, शासकीय परिवहन सेवा, वरळी, मुंबई ४०००३०,
४. वित्त विभाग, (व्यय-४)/विनियम, मंत्रालय, मुंबई ४०००३२,
५. सामान्य प्रशासन माहिती तंत्रज्ञान संचालनालय, मंत्रालय, मुंबई
६. अवर सचिव (१७-स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. श्री. संतोष आंब्रे, ए टू झेड गॅरेज, आर दालमिया कम्पाऊंड, शक्ती मिल लेन, महालक्ष्मी, मुंबई- ४०००११.
८. श्रीम. द्वारका सु. ठोंबरे, सुंदर ऑटो वर्क, ४४/३८, अशोक मिल कम्पाऊंड, काला किल्ला जवळ, सायन बांद्रा लिंक रोड, धारावी, मुंबई- ४००००१७
९. श्री. विरेंद्र वि. म्हात्रे, माऊली ऑटो पार्टस्, ४८७, एस. व्ही. पी. रोड, ओपेरा हाऊस, मुंबई ४०००४